दिनांक २८, २९ व ३० मार्च १९८८ रोजी लाक्षणिक संपात भाग घेऊन अनुपस्थित राहिलेल्या शासकीय कर्मचा-यांबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक एसटीके-१०८८/सीआर-२०-बी/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ७ डिसेंबर १९८८.

वाचा :- १] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसटीके-१०८८/सीआर-२०/१६-अ, दिनांक २६ मार्च १९८८.

२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसटीके-१०८८/सीआर-२०-बी/१६-अ, दिनांक १२ जुलै १९८८.

शासन निर्णय :- महाराष्ट्र राज्य कर्मचारी समन्वय महासंघ, नागपूर, यांनी दिनांक २८, २९ व ३० मार्च १९८८ रोजी कर्मचा-यांना लाक्षणिक संपाचे आवाहन केले होते. त्या संपात भाग घेऊन जे कर्मचारी कार्यालयात अनुपस्थित होते, त्यांच्या अनुपस्थितीचा कालावधी असाधारण रजा [विनावेतन रजा] देऊन नियमित करण्याबाबतचे आदेश समक्रमांकाच्या दिनांक १२ जुलै १९८८ च्या शासन निर्णयानुसार देण्यात आले होते. त्यांत बदल करुन शासन आता असे आदेश देते की, जे कर्मचारी त्या दिवसांच्या अनुपस्थितीसाठी ज्या देय व अनुज्ञेय रजेची किंवा नैमित्तिक रजेची मागणी करतील ती रजा त्यांना देण्यात यावी व इतरांच्या बाबतीत त्या दिवसांची अनुपस्थिती महाराष्ट्र नागरी सेवा [रजा] नियम, १९८१ च्या नियमांतील नियम ६३ प्रमाणे "असाधारण रजा" [विनावेतन रजा] देऊन नियमित करण्यात यावी. मात्र असाधारण रजेवर असताना अनुज्ञेय असलेले भत्ते [स्थानिक पूरक भत्ता व घरभाडे भत्ता] त्यांना देण्यात यावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्र. द. माळवे,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व सचिव,
xप्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
xप्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
xप्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई

[कृ. मा. प.

शासमु-रोटा-सापृवि-एच ७२३[३०००-१२-८८]

महालेखापाल, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-२, नागपूर,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
सर्व कोषागार अधिकारी,
मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व इतर विभाग प्रमुख व
कार्यालय प्रमुख,
मंत्रालयीन सर्व विभाग,
निवड फाईल.

---

xपत्राने.